औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी, जिल्हा -मुंबई शहर व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जिल्हा ठाणे या संस्थेच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामासाठी तरतूद वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः औप्रसं-२०२२/प्र.क्र.६/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: १५ मार्च, २०२२

वाचा -

(१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र:आयटीआय-२००९/(११/०९)/व्यशि-३, दि.२९ ऑगस्ट, २००९

(२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र:आयटीआय-२०१०/ (१७०/१०)/व्यशि-२, दि.११ ऑगस्ट, २०१०

(३) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र:औप्रसं-२०१०/प्र.क्र.१५१/का.८, दि.२२ फेब्रुवारी, २०११ व दि.२८ ऑक्टोबर, २०२०

(४) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०११/प्र.क्र.११२/व्यशि-३, दि.०७ मे, २०१२

(५)अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र: औप्रसं-२०१३/प्र.क्र.७२/का.८, दि.११ मार्च, २०१४ व दि.१५ नोव्हेंबर, २०१४

(६)उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र : प्रशामा-२०१३/प्र.क्र.१२०/व्यशि-२, दि.१ सप्टेंबर, २०१४

(७)कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र: प्रशामा-२८११/२०२१/प्र.क्र.४६ /व्यशि-२, दि.९ एप्रिल, २०२१

(८) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र:औप्रसं-२०११/प्र.क्र.९२/का.८, ३ ऑगस्ट, २०१६, दि.८ डिसेंबर, २०१७, दि.२८ मार्च, २०१८

(९)अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र:औप्रसं-२०१८/प्र.क्र.८७/का.८, दि.११, फेब्रुवारी, २०१९, ५ फेब्रुवारी, २०२०, दि.१४ सप्टेंबर, २०२०, व दि.२५ फेब्रुवारी, २०२१

(१०) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र:अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१, १४ ऑक्टोबर, २०२१ व दि.३ फेब्रुवारी, २०२२

(११)कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग वरळी, मुंबई यांचे पत्र क्र.काअ/बांवि(वरळी)वलेलि/१३७५, दि.१७/११/२०२१

(१२)कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, ठाणे यांचे पत्र क्र.सा.बां./ठाविक्र.१/प्रशा-५/९३५९, दि.८/१२/२०२१

(१३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. १२/नियोजन/२०२१-२२/प्र.क्र.७७/१७, दि.१७ जानेवारी, २०२२

(१४) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. १२/नियोजन/मुंब्रा नि.वि./ २०२१/ प्र.क्र.५६-२०२१-२२/३२, दि.२८ जानेवारी, २०२२

**<u>प्रस्तावना -</u>**

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांसाठी ४२ अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसऱ्या/तिसऱ्या पाळीत २४८ तुकडया त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरु होणाऱ्या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये २८ तुकडया सुरु करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी, जिल्हा मुंबई शहर या संस्थेच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकामास संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये रु.८,१४,३८,५५४/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानंतर संदर्भ क्रमांक.७ च्या शासन निर्णयान्वये सदर इमारतीच्या बांधकामाकरीता रु.११,६४,०७,१११ /- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक. ३ व ५ येथील शासन निर्णयांन्वये एकूण रु.६,८०,००,०००/-इतका निधी औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी येथील बांधकामाकरिता वितरीत करण्यात आला आहे.

३. उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये “मुंब्रा-कौसा, जिल्हा ठाणे” या ठिकाणी अल्पसंख्यांकांसाठी नवीन औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यास, “सदर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यासाठी पदनिर्मिती, प्रस्तावित योजनेकरिता जागा उपलब्ध झाल्यानंतर इमारत बांधकाम, साधनसामुग्री व यंत्रसामुग्री इ. साठी लागणाऱ्या अपेक्षित खर्चाकरिता अल्पसंख्याक विकास विभागाकडून अनुदान उपलब्ध होईल” या अटीच्या अधीन राहून तत्वत: मान्यता देण्यात आली आहे.

४. औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जिल्हा ठाणे या संस्थेच्या कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामाकरिता संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये रू.११,९१,०९,९४६/- (अक्षरी रूपये अकरा कोटी एक्यान्नव लक्ष नऊ हजार नऊशे सेहेचाळीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक. ८ व ९ येथील शासन निर्णयांन्वये एकूण रु.८,९४,००,०००/- इतका निधी औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जि. ठाणे या संस्थेच्या बांधकामाकरिता वितरीत करण्यात आला आहे.

५. अल्पसंख्यांकांसाठी नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यासाठी सन २०२१-२२ करिता “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, (०१) (०६) अल्पसंख्याक वस्तीतील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना अनुदान देण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए १२२) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखाली रु.११,००,००,०००/- (अक्षरी रू. अकरा कोटी फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ क्र.११, १२, १३ व १४ येथील पत्रान्वये औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी, जिल्हा मुंबई शहर व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जिल्हा ठाणे या संस्थेंच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकामासाठी निधी वितरीत करण्याची मागणी केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१० च्या शासन निर्णयास अनुसरुन सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी, जिल्हा मुंबई शहर व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जिल्हा ठाणे या संस्थेंच्या प्रशासकीय इमारत व कार्यशाळा बांधकामासाठी वरिष्ठ सचिव समितीने मान्यता देतांना नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयास अनुसरून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता कार्यक्रमावरील खर्चासाठी एकुण रु. ६,५७,०९,९४६/- (अक्षरी रुपये सहा कोटी सत्तावन लाख नऊ हजार नऊशे सेहेचाळीस फक्त) इतकी तरतूद खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | संस्थेचे नाव | प्रस्तावित निधी |
|---|---|---|
| १. | औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी, जिल्हा मुंबई शहर | **रु. ३,६०,००,०००/-** |
| २. | औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मुंब्रा, जिल्हा ठाणे | **रु. २,९७,०९,९४६/-** |
| | **एकूण** | **रु. ६,५७,०९,९४६/-** |

७. सदर रक्कम संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते “नियंत्रक अधिकारी” म्हणून काम पाहतील. तसेच त्यांनी नेमून दिलेला अधिकारी “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून काम पाहील.

८. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी, शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/ कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/कार्यालयीन आदेश/सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्य नियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

९. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विदयार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

१०. यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, (०१) (०६) अल्पसख्याक वस्तीतील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना अनुदान देण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए १२२) ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)” या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

११. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान

करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१, दि.१४ ऑक्टोबर, २०२१ व दि.३ फेब्रुवारी, २०२२ मधील अटींची पुर्तता असल्याने प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे." सदर प्रस्तावास अनौपचारिक संदर्भ क्र.४७/१४७१, दि.४/२/२०२२ अन्वये नियोजन विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे. तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.३६/२०२२/व्यय-१, दि.३/३/२०२२ अन्वये वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१५१७२३५८०६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.03.15 17:36:59 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

(१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
(२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
(३) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
(४) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
(५) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,
(६) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मांडवी, जि.मुंबई शहर,
(७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
(८) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वरळी, मुंबई,
(९) कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, ठाणे
(१०) संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालक, व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत)
(११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
(१२) नियोजन विभाग का. १४७१,
(१३) वित्त विभाग, व्यय-१/ अर्थ-३ व १४,
(१४) अवर सचिव (का. ७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी संबंधितांना BDS वर कृपया तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.
(१५ )निवडनस्ती (का.८).